# गुलीवरचा प्रवास

जॉनाथन स्विफ्ट



# गुलीवरचा प्रवास

## जॉनाथन स्विफ्ट

मराठी : अश्विनी बर्वे





गुलीवर : एक साहसी खलाशी आहे. ज्याचे जहाज समुद्राच्या एका भागात उद्ध्वस्त होते. त्याचा शोध घेतला जातो.

गैबी : शहरातला घोषणाकर्ता आहे. तो लिलिपुट च्या लोकांचे रक्षण करतो. लिलिपुट मध्ये असणाऱ्या एका राज्याचा गुलीवर राजा आहे.

छोटा राजा : हा एक खुशमिसाल राजा आहे आणि त्याच्या मुलीचे नाव आहे.

राजकुमारी ग्लोरी : जी दिसायला सुंदर आहे. तिचे लग्न ठरलं आहे आणि तिचे लग्न ज्याच्याशी ठरले आहे त्याचे नाव आहे ... .

राजकुमार डेविड : तो खूप सुंदर आणि साहसी आहे. त्याचे वडील आहेत....

राजा बोम्बो : तो जवळच्या टापूचा राजा आहे. त्यांची खूप मोठी नौ सेना आहे आणि त्यांचे तीन खतरनाक असे गुप्तहेर आहेत. – स्नूप, स्निच आणि स्नीक.



खूप जुनी गोष्ट आहे. एक इंग्रज खलाशी गुलीवर याचे जहाज विशाल अशा समुद्रात उद्‌वस्त झाले. जोराचे वादळ होते. समुद्रात उंच उंच लाटा येत होत्या. पण गुलीवर धाडसी आणि बलवान होता. तो कशाही प्रकारे पोहत पोहत एका जागेवर जाऊन पोहचला. तिथे बारीक चिकनी वाळू होती. गुलीवर थकला होता. तो किनाऱ्यावर पोहचताच झोपी गेला..

झोपतांना गुलीवरला वेळेचे भान नव्हते की तो कुठे पोहचला आहे याचा अंदाज नव्हता. खरंतर तो लिलिपुट राज्यात होता. तसा तर लिलिपुट हा देश जगात अजब असा होता. तिथले लोक बुट्टे होते. लोकांची उंची अंगठ्या इतकी होती. त्या देशातले लोकच नाहीतर तिथली प्रत्येक गोष्ट-फुलं, घर, आणि प्राणी सुद्धा खूप-खूप छोटे होते. तुम्हांला पाहिजे असेल तर डझनभर घोडे तुम्ही तुमच्या तळ हातावर ठेवू शकत होते. तुमच्या छोट्या बोटाने तिथली मोठी-मोठी झाडं सहज पाडू शकतात.

जेव्हा गुलीवर झोपला होता, तेव्हा एक बुट्टा हातात कंदील घेवून त्याच्या हाताला धडकला. त्या बुट्टाचे नाव गैबी होते. गैबी लिलिपुटचा घोषणाकर्ता होता. लिलिपुटच्या लोकांचे रक्षण करण्याचे काम त्याचे होते. जर काही संकट आले तर त्याची सूचना लगेच लिलिपुटच्या लोकांना देण्याचे काम तो करत असे..





जेव्हा गैबीने गुलीवरला पाहिले तेव्हा तो स्वतःच घाबरला होता. असं तर कोणीही घाबरले असतेच. जर तुम्ही अचानक एक भीमकाय राक्षस आपल्या हातावर उभा असलेला पाहिला असता तर कदाचित तुमचे सुद्धा हेच हाल झाले असते. मग गैबी तिथून पळत पळत शहराच्या चौकात पोहचला. आणि त्याने आपल्या या शोधा विषयी सगळ्या शहरवासीयांना सांगितले.



गैबीने सांगितलेली बातमी ऐकून शहरातले लोक उत्तेजित झाले. पण जेव्हा लोक छोट्या राजाला बातमी सांगायला गेले तेव्हा महालाच्या पहारेकऱ्यांनी त्यांना आत जाऊ दिले नाही. का? कारण त्यावेळी छोटा राजा आणि नजिकच्या प्रदेशातील राजा बोम्बो यांच्यात जोरात चर्चा चालू होती. तसे तर दोन्ही राजे खुश होते कारण छोट्या राजाची मुलगी राजकुमारी ग्लोरी आणि राजा बोम्बोचा मुलगा राजकुमार डेविड यांचे लग्न ठरले होते. पण आता असे वाटत होते की हे लग्न आता कधीच होणार नाही.



कारण? लिलिपुटचे राष्ट्रीय गीत “प्रामाणिक“ हे लग्नाच्या वेळी वाजवलेच पाहिजे या मुद्दावर छोटा राजा हटून बसला होता. पण तर दुसऱ्या बाजूला बोम्बोला वाटत होते की लग्नाच्या वेळी त्याच्या देशाचे राष्ट्रगीत “नेहमी” हे वाजवले पाहिजे.



“आमच्या प्रत्येक लग्नात “प्रामाणिक” हेच राष्ट्रगीत वाजते,” छोट्या राजाने सांगितले. “ही लिलिपुटची जुनी परंपरा आहे. तसेही ते गाणं ऐकायला गोड वाटते.”

“ठीक आहे, ते मला सर्व माहित आहे,” राजा बोम्बोने उत्तर दिले. ”प्रामाणिक” हे एक चांगले गाणे आहे. पण या शुभ वेळेला ते गाणं उपयुक्त नाही. यावेळेला माझ्या देशाचे राष्ट्रगीत “नेहमी” च शोभेल.

“नाही, “प्रामाणिक” ज़रूर वाजेल,” छोट्या राजाने शांततेने पण पर दृढ़ आवाजात सांगितले.

“नाही,” राजा बोम्बो ओरडला आणि त्याचा चेहरा गरम होवू लागला. “लग्नात एक तर आमचं राष्ट्रगीत वाजेल नाहीतर लग्नच होणार नाही.” मग राजा बोम्बोने हा मसला युद्ध करून सोडवण्याचा निर्णय घेतला. आणि हा निर्णय सांगून रागाने राजा बोम्बो निघून गेला.

राजा बोम्बो गेल्यानंतर छोट्या राजाला या घटनेचे फार दुःख झाले. “युद्ध काही चांगली गोष्ट नाही.” त्याने विचार केला. “युद्धात लोक मारले जातात. काही घायाळ होतात.” पण छोट्या राजाला युद्धाच्या बाबतीत फार विचार करावा लागला नाही कारण तेव्हाच गैबी गुलीवरची बातमी घेवून धावत आला. छोटा राजा युद्धाच्या बाबतीत विचार करून खोल दुःखात बुडाले होते. म्हणून जेव्हा गैबी चार वेळा ओरडला, ”आपल्या किनाऱ्यावर एक राक्षस आहे.” तेव्हा राजाला शुद्ध आली. त्याने आज्ञा केली की, झोपलेल्या राक्षसाला झोपेतच बांधा.





छोट्या राजाने राक्षसाला बांधून महालाच्या जवळ आणण्याची आज्ञा दिली. पण लिलिपुटच्या छोट्या लोकांना गुलीवर सारख्या भीमकाय राक्षसाला महालापर्यंत आणणे सोपे काम नव्हते. म्हणून लोक रात्रभर हे काम करत होते.



सकाळ होताच त्यांनी गुलीवरला बारीक बारीक दोराने बांधले. मग त्यांनी गुलीवरला एका विशिष्ट प्रकारे तयार केलेल्या मोठ्या गाडीत घातले.



त्यानंतर शंभर घोड्यांनी ती गाडी समुद्र तटावरून ओढत शहराच्या मधोमध आणली. छोटा राजा आपल्या गच्चीवर गुलीवरला बघण्यासाठी आला. त्यांनी गुलीवरची चांगली तपासणी केली. मग छोट्या राजाने शिपायांना त्या राक्षसाचे खिसे तपासायला सांगितले. शिपायांना सगळ्यात पहिले गुलीवरची बंदुक मिळाली. त्यानंतर गैबीने लगेच बंदुक चालवून बघितली. लिलिपुटचे लोक बंदुकीचा आवाज ऐकून आश्चर्यचकित झाले. बंदुकीचा आवाज त्यांना टोफेपेक्षा अधिक दमदार वाटला. बंदुकीच्या गोळीने त्यांच्या शहरातली एक उंच इमारत पडली.

मग काय झाले? बंदुकीच्या आवाजाने गुलीवर झोपेतून जागा झाला. तेव्हा त्याच्या लक्षात आले की त्याला शेकडो दोऱ्यानी बांधले आहे. त्याने लगेच बंधने तोडली. मग त्याने जवळपास बघितले आणि तो कुठे आहे हे जाणण्याचा प्रयत्न केला.





त्या भीमकाय राक्षसला चालतांना बघून लिलीपुटचे बुट्टे एकदम थरारले. गैबी तर घाबरून ओरडत तिथून पळाला. गुलीवर त्या ओरडणाऱ्या माणसाला बघून उत्सुक झाला आणि थोड्या वेळाने गैबी त्याच्या हातावर होता. गुलीवरचा हेतू गैबिला इजा करण्याचा नव्हता. पण कोणालाच गुलीवरच्या मनातले कोणाला माहित नव्हते. छोटा राजा आपल्या सैन्याला गुलीवर वर आक्रमण करायला सांगणार तेवढ्यात एक सैनिक पळत आला. त्याने छोट्या राजाला सांगितले की, राजा बोम्बो त्याची जहाजे घेवून आपल्यावर आक्रमण करण्यस येत आहे.
हे ऐकताच लीलीपुटचे लोक गुलीवरला सोडून राजा बोम्बोची सेना बघायला पळाले. पण ते काहीसे लांबच होते, तेव्हा गुलीवर उठला आणि त्याने लिलिपुट कडे येणारी राजा बोम्बोची नौसेना पाहिली.

“अरे बापरे,” राजा बोम्बो ओरडला, “माझा विश्वासच बसत नाही. हा राक्षस खरा आहे का? की नकली आहे? हे बरोबर नाही. मला अजिबात भीती वाटत नाही. पण तरीही मी सावध असायला हवं.” त्यानंतर राजा बोम्बोने आपल्या जहाजांचे तोंड दुसरीकडे वळवले. त्याच्या नौसेनेची जहाजे लिलिपुटच्या किनाऱ्या पासून दूर जावू लागली.

जेव्हा छोट्या राजाने आणि लिलीपुटच्या निवासिनी बघितले की गुलीवर मुळेच त्यांनी युद्ध जिंकले आहे. तेव्हा त्यांनी गुलीवरच्या प्रती त्यांचे प्रेम व्यक्त केले आणि त्याचे आभार मानले.

काही काळ गुलीवर, लिलीपुटच्या छोट्या लोकांबरोबर राहून खुश झाला. मग त्याची मैत्री छोट्या राजाच्या मुलीशी राजकुमारी ग्लोरीशी झाली. एक दिवस राजकुमारीने गुलीवरला तिची पूर्ण रामकहाणी सांगितली. दोन्ही राजामध्ये लग्नाच्या वेळी कोणते गीत – “प्रामाणिक की “नेहमी” यापिकी कोणते गाणं वाजवले जाईल त्यावरून भांडण झाले. यामुळे ती तिचा प्रियकर डेविड याच्याशी लग्न करू शकली नाही. गुलीवरला ही गोष्ट मूर्खपणाची वाटली. गुलीवरने सल्ला दिला की लग्नाच्यावेळी दोन्ही देशांचे राष्ट्रगीत “प्रामाणिक, आणि नेहमी “एकाच वेळी वाजवा. त्याला आशा होती की आपल्या प्रियकराशी लग्न करून राजकुमारी खुश होईल. पण थोड्याच वेळात त्याच्या लक्षात आले की, त्याच्या या आशेवर पाणी फिरणार. कारण राजकुमारीने घोड्यावर स्वार होवून राजकुमार जोरात येतांना पाहिला. पहारेकऱ्यापासून वाचण्यासाठी तो पळत होता. जेव्हा गुलीवरने हे दृश्य पाहिले, त्याने खाली वाकून घोड्यासहित राजकुमाराला आपल्या हाताने उचलले आणि त्याला राजकुमारीच्या खोलीच्या बाल्कनीत ठेवले. आता राजकुमार पहारेकऱ्यापासून सुरक्षित होता.



राजकुमार आणि राजकुमारी एकमेकांना बघून खूप खुश झाले. त्यांना युद्धाचा शेवट करणाऱ्या आणि लग्न करण्यासाठीचा उपाय खूप आवडला. पण त्यांना ही गोष्ट माहित नव्हती की, मधल्या काळात राजा बोम्बोच्या तीन गुप्तहेर –स्नूप, स्निच आणि स्नीक ने, गुलीवरची बंदूक चोरली होती आणि राजा बोम्बो लिलिपुटच्या राजावर दुसरे आक्रमण करण्याची तयारी करत होता.





राजा बोम्बोला एवढे नक्की माहित होते की, जोपर्यंत गुलीवर त्यांच्या विरुद्ध आहे तोपर्यंत ते युद्ध कधीच जिंकू शकणार नाही. म्हणून त्यानी आपल्या तीन गुप्तहेरांना एक गुप्त संदेश पाठवला होता.

प्रिय गुप्तहेरांनो

त्या राक्षसाला नष्ट करा, नाहीतर

आपला

राजा बोम्बो





राजा बोम्बोने हा संदेश आपल्या आपल्या गुप्तहेरांना पाळीव कबुतराच्या हाती पाठवला. सुदैवाने गैबीने त्या कबुतराला पाहिले. आणि त्याने कबुतराकडून तो संदेश हिसकावून घेतला.



मग गैबीने ती बातमी सगळ्या लिलीपुटच्या रहिवाशांना दिली. त्याने लोकांना सांगितले की राजा बोम्बो त्यांच्यावर दुसऱ्यांदा आक्रमण करणार होता.

जसे गुलीवरला ही बातमी समजली, तसे तो पाण्यात उतरला आणि त्याने राजा बोम्बोला आपल्या कबज्यात घ्यायचं ठरवलं. पण गुलीवरला याचा अंदाज नव्हता की त्याची बंदुक राजा बाम्बोच्या तीन गुप्तहेरांनी चोरली आहे. आणि ते त्याच बंदुकीने त्याला मारणार आहे.तीन गुप्तहेर त्या बंदुकीने गोळी मारण्याचा प्रयत्न करत होते, तेव्हाच राजकुमार डेविडने त्यांना महालाच्या खिडकीतून पाहिलं. राजकुमार आपल्या घोड्यावर बसून धावला आणि तो सरळ त्या तीन गुप्तहेरांजवळ गेला. पण परिणाम काय झाला? बंदुक तर चालली, पण गोळी गुलीवरला न लागता समुद्रात दुसऱ्या दिशेला गेली.



राजकुमारने हे खूप धाडसाचे काम केले होते. राजकुमाराच्या मुळेच गुलीवरचे प्राण वाचले ओटे. पण राजकुमार त्या तीन गुप्तहेरांशी लढल्यानंतर स्वतःच जमिनीवर पडला. तो जमिनीवर असा पडला की जसा तो मेला आहे. जेव्हा दोन्ही राजांनी आणि त्यांच्या सेनांनी राजकुमार डेविडला असे जमिनीवर पडलेले पाहिले तेव्हा त्यांना लाज वाटली. त्यांनी लगेच युद्ध बंद करण्याचे ठरवले. पण राजकुमार खरं तर मेला नव्हता. त्याला फक्त जखम झाली होती. काही मिनटानंतर राजकुमार उठला आणि राजकुमारीला भेटण्यासाठी पळाला.

हे सगळं बघून लोक खूप प्रसन्न झाले. गुलीवरचा सल्ला खूप उपयुक्त होता, लग्नाच्या वेळी दोन्ही देशांचे राष्ट्रगीत “प्रामाणिकता“ आणि “नेहमी“ हे वाजवले गेले. लोक शहरातल्या रस्त्यावर नाचू लागले आणि लग्न साजरे करू लागले.



काही आठवड्यानंतर गुलीवरला परत लंडनला जावेसे वाटू लागले. त्याचे आभार मानण्यासाठी दोन्ही देशांच्या लोकांनी त्याच्यासाठी एक मोठी नाव बनवली. ज्यामुळे तो सुरक्षित पोहचेल. गुलीवरच्या परत जाण्याच्या वेळी दोन्ही देशातल्या लोकांना एकच गोष्ट मान्य होती – कदाचित जगातला सगळ्यात चांगला आणि प्रामाणिक राक्षस गुलीवरच आहे.



